महिला व बाल विकास विभागांतर्गत क्षेत्रिय आस्थापनेवरील गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विशेष कारणास्तव बदली करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : मबाआ-२०२३/प्र.क्र.६५/का.७ अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दि.१५ मार्च, २०२४.

वाचा:- शासन आदेश क्रमांक : मबाआ-२०२३/प्र.क्र.५६/का.७, दि. ३० जून, २०२३ व दि.३१.१०.२०२३.

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अमलात आले आहेत. सदर अधिनियमातील कलम कलम ४ (१), ४ (२) व ४(३) मधील तरतुदीनुसार, सक्षम प्रधिकाऱ्यांच्या मान्यतेने विभागांतर्गत जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी /बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण)/अधीक्षक,शासकीय संस्था/ निरीक्षक,प्रमाणित शाळा व संस्था व तत्सम पदे या गट-ब संवर्गातील बदलीपात्र अधिकाऱ्यांचे प्रशासकीय बदल्यांचे आदेश दि.३०.६.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आले होते. त्यामध्ये खालील नमूद अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन त्यांची दि.३१.१०.२०२३ च्या आदेशान्वये सुधारीत पदस्थापनेचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. आता बदली अधिनियमातील कलम ४(४)(दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार खालील नमूद अधिकारी यांची सक्षम प्राधिकारी यांच्या लगतपूर्व वरिष्ठ प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या मान्यतेनुसार रकाना क्र.४ मध्ये दर्शविल्यानुसार प्रशासकीय कारणास्तव सुधारीत पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | दि.३१.१०.२०२३ च्या आदेशान्वये करण्यात आलेली पदस्थापना | सुधारीत पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.निलेश गोरक्षनाथ राऊत, (परिच्छेद २ नुसार) | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रा), राहता, जि.अहमदनगर | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), संगमनेर, जि.अहमदनगर | रिक्त पदावर |

२. श्री.निलेश राऊत यांची दि.३१.१०.२०२३ च्या आदेशान्वये बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रा), राहता, जि.अहमदनगर या पदावर सुधारीत पदस्थापना करण्यात आली होती. तथापि, सदर पदावर श्री.राऊत हे रुजू झालेले नाहीत. त्यामुळे त्यांनी आता या आदेशान्वये बदली केलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. श्री.राऊत हे विना परवानगी अनुपस्थित असल्याने त्यांच्या अनुपस्थितीबाबतचा प्रस्ताव आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी आपल्या स्वयंस्पष्ट अभिप्रायासह शासनास सादर करावा.

३. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. संबंधित अधिकाऱ्यांनी अन्य आदेशाची वाट न पाहता बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन त्याबाबतचा अहवाल आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे, आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई व शासनास desk7a.wcd-mh@mah.gov.in या ई-मेल वर सादर करावा.

४. उपरोक्त अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

५. उपरोक्त अधिकाऱ्यांना पुर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने त्यांचा कोणत्याही प्रकारचा रजेचा अर्ज स्विकारू नये.

६. उपरोक्त अधिकारी यांना बदलीच्या पदावर रूजू करून घेताना, ते रजेवर /गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करून घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करून घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरून घ्यावा आणि नंतर हजर करून घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय/परिपत्राकांतील निर्देशांचे पालन करावे.

७. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेततर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, उपरोक्त अधिकारी यांनी बदलीच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी, अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या ठिकाणी रूजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यादिन (dies non) म्हणून गणला जाईल.

८. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या बदली ही विनंतीनुसार असल्याने त्यांना प्रवास भत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१८३६४३८३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2024.03.15 18:56:32 +05'30'

**( रा.ता.भालवणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,महिला व बाल विकास विभाग यांचे खाजगी सचिव
२. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
३. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
४. मा.सचिव,(म.व बा.वि.वि.), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

५. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (आयुक्तालयामार्फत)
६. संबंधित विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास विभाग (आयुक्तालयामार्फत)
७. महालेखापाल १ /२ (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई/नागपूर (आयुक्तालयामार्फत)
८. संबंधित अधिदान व लेखाधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
९. संबंधित अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
१०. निवडनस्ती (कार्यासन-७ अ).